**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ करीता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत...**
**(लेखाशिर्ष २२३५ सी १६१)**
**(लेखाशिर्ष २२३५ सी १७२)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४ / प्र.क्र. ६ / कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०६ सप्टेंबर,२०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

३) आदिवासी विकास विभाग, समक्रमांकित शासन निर्णय,दि.२९.०६.२०२४.

४) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाची नस्ती क्र. विसयो-२०२४/प्र.क्र.३९/विसयो.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या संजय गांधी निराधार अनुदान व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींपैकी अवितरीत असलेला उर्वरीत निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ अन्वये प्रस्ताव सादर केला होता. तथापि, वित्त विभागाने संजय गांधी निराधार अनुदान या योजनेसाठी ४३ टक्के मर्यादेत व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन या योजनेसाठी ४४ टक्के मर्यादेत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत केला आहे.

त्यास अनुसरुन वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या एकूण वितरीत निधीपैकी उपलब्ध असलेल्या उर्वरीत निधीतून संजय गांधी निराधार अनुदान या योजनेसाठी रु.४५.०० कोटी व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन या योजनेसाठी रु.७०.०० कोटी असा एकूण रु.११५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण मधील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या तरतुदींतून संजय गांधी निराधार अनुदान व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन या योजनांसाठी खालीलप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नांव | लेखाशीर्ष | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी वितरीत केलेला निधी | या शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| संजय गांधी निराधार अनुदान योजना | २२३५ सी १६१ | ३००.०० | ८४.०० | ४५.०० |
| श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना | २२३५ सी १७२ | ५५०.०० | १७२.०० | ७०.०० |
| | **एकूण** | **८५०.००** | **२५६.००** | **११५.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.११५.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे पंधरा कोटी फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांतील तरतुदींस अनुसरुन व वित्त विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२८१७३६३२१४२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP RAMCHANDRA MORE

Digitally signed by PRADEEP RAMCHANDRA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c62a84635af1af3d28cc19eeb7308ac22a78a4b28fb5d654700269da75d60aa8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B6C8332E4A8523ACECD736AC47FF2BA698F66CC8A18822C2707D7F1BB024B5A, cn=PRADEEP RAMCHANDRA MORE
Date: 2024.09.06 13:18:29 +05'30'

**( प्रदिप रा.मोरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.